**ग्रामीण पायाभूत विकास निधी (RIDF) मालिका-२२ अंतर्गत नाबार्डकडून प्राप्त होणा-या कर्जातून मासळी उतरविण्याच्या केद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा उपलब्ध करण्याच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: मत्स्यवि-२०१७/प्र.क्र.४५/पदूम-१४**

मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ००३२

दिनांक: २३ फेब्रुवारी, २०१७

वाचा: १) वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई यांचे पत्र क्रमांक नाबार्ड-२०१७/प्र.क्र.४/अर्थबळ, दिनांक: ५ जानेवारी,२०१७

२) राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक (नाबार्ड),पुणे यांचे पत्र क्रमांक NB/MRO/SPD/RIDF-१२१ A (Maharashtra)/१९ ISC/२०१६-१७, दिनांक: १३ फेब्रुवारी,२०१७.

३) आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे पत्र क्रमांक मत्स्य/अभि/१८०२०१/१४१ / २०१६, दिनांक ३ फेब्रुवारी,२०१७

**प्रस्तावना:**

महाराष्ट्रातील सागरी जिल्हयांमध्ये असणा-या मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांसाठी ब-याच ठिकाणी फार कमी प्रमाणात मुलभूत सोयी-सुविधा उपलब्ध आहेत. ग्रामीण पायाभूत विकास निधी (RIDF) योजने अंतर्गत नाबार्डकडून प्राप्त होणा-या कर्जामधून राज्यातील सागरी जिल्हयामध्ये मासळी उतरविण्यासाठी मच्छिमारांना मुलभूत सोयी-सुविधा उपलब्ध करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. यासंदर्भात मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली ग्रामीण पायाभूत विकास निधी उच्चाधिकार सचिव समितीच्या दिनांक २६.१२.२०१६ रोजी झालेल्या बैठकीत या योजनेच्या मालिका २२ अंतर्गत मत्स्यव्यवसाय विभागासाठी एकूण १२प्रकल्पांची रु.११०.०० कोटी इतकी प्रकल्पांची किंमत निश्चित करण्यात आली आहे. त्यापैकी, उच्चाधिकार समितीने सन २०१६-१७ करीता एकूण ७ प्रकल्पांसाठी रु.६०.०० कोटी इतक्या रकमेस मंजुरी दिली आहे व उर्वरित रु.५०.०० कोटीचे ५ प्रकल्प पुढील वर्षासाठी शेल्फवर ठेवण्यात आले आहेत. त्यानुषंगाने वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ५ जानेवारी,२०१७ च्या पत्रान्वये मासळी उतरविण्याच्या ठिकाणी मच्छिमारांना मुलभूत सोयी-सुविधा पुरविणे यासाठी रु.६०.०० कोटी रक्कमेच्या ७ कामांच्या प्रस्तावास कर्ज मंजुरीची शिफारस नाबार्डला करण्यात आली. नाबार्डने सदर ७ कामांना संदर्भाधीन दिनांक १३ फेब्रुवारी २०१७ च्या पत्रान्वये रु. ६०.०० कोटी इतके कर्ज मंजूर केले आहे. या कामांसाठी राज्य हिस्सा रु.३.१६ कोटी विचारात घेऊन एकूण रु.६३.१६ कोटींच्या कामांना नाबार्डने त्यांच्या दिनांक १२/२/२०१७ च्या पत्रान्वये मान्यता दिल्यामुळे प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

ग्रामीण पायाभूत विकास निधी (RIDF) योजने अंतर्गत मालिका-२२ मध्ये नाबार्डकडून प्राप्त होणा-या कर्जामधून राज्यातील सागरी जिल्हयामध्ये मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी-सुविधा उपलब्ध करण्यासाठी सोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये नमूद केलेल्या ७ कामांसाठी रु.६३१६.०० लाख (रुपये त्रेसष्ट कोटी सोळा लाख फक्त.) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. आयुक्त, मत्स्यव्यवसाय,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी सदर कामांची प्रचलित नियमानुसार निविदा प्रक्रीयेबाबतची पुढील कार्यवाही करावी व आवश्यक त्या स्तरावरील ना-हरकत परवानगी प्राप्त करुन घेण्यात याव्यात. सदरहू कामा अंतर्गत झालेल्या खर्चाच्या प्रतीपूर्तीचे दावे विहित प्रपत्रात वेळच्या वेळी नाबार्डकडे सादर करण्यात यावेत. तसेच झालेल्या खर्चाचा व कामांचा दर तिमाही आढावा घेवून शासनास अहवाल सादर करावा.

३. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २४१/१६/व्यय-२, दि.४.१०.२०१६ ला अनुलक्षून निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२२३१७२५१७०७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chitrakala Suryawanshi

Digitally signed by Chitrakala Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b61aaca1243458a7300585877d01b18c73211c3f79c97f57bd06e1e79a2a57ae, cn=Chitrakala Suryawanshi
Date: 2017.02.27 15:40:52 +05'30'

**(चि.नि.सुर्यवंशी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
२. मा.मुख्यमंत्रयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३. आयुक्त, मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य,मुंबई
४. संचालक / मुख्य अभियंता, CICEF , बेंगलूरु.
५. मुख्य महाव्यवस्थापक, राष्ट्रीय कृषी व ग्रामीण विकास बँक, महाराष्ट्र क्षेत्रीय कार्यालय, पुणे
६. सहआयुक्त (सागरी), आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय,मुंबई
७. कार्यकारी अभियंता, आयुक्त, मत्स्यव्यवसाय यांचे कार्यालय,मुंबई
८. प्रादेशिक उपायुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई

९. सहाय्यक आयुक्त, मत्स्यव्यवसाय, मुंबई/ठाणे/पालघर/रायगड/रत्नागिरी/सिंधुदूर्ग,
१०. महालेखापाल, महाराष्ट्र राज्य १ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
११. वित्त विभाग, (व्यय-१/अर्थसंकल्प-१५/अर्थोपाय/अर्थबळ) मंत्रालय,मुंबई-३२
१२. नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
१३. अवर सचिव, पदूम-१६, कृषि व पदूम विभाग, मंत्रालय,मुंबई
१४. निवडनस्ती

**शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्रमांकः मत्स्यवि-१११७/प्र.क्र.४५/पदुम -१४**
**दिनांक २३ फेबुवारी २०१७**
**सोबतचे प्रपत्र-अ**

| अक्र. | कामाचे नाव | कामाचे स्वरुप | प्रकल्प किंमत रुपये लाखात |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | पाचूबंदर, ता. वसई जि. पालघर येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | बोटयार्ड १५० X २५ मी. व १०० X २५ मी,<br>उतरता रॅम्प नवीन ३ नग ( ६० X १२ मी.)<br>उतरत्या रॅम्पचे रुंदीकरण १ नग ( ९० X १० मी.),<br>उतरत्या रॅम्पची लांबी वाढविणे ३ नग (२०X १०मी.)<br>जोडरस्ता ( ९६० X ५ मी.) | ९३०.०० |
| २ | दिवाळे गाव ता. बेलापूर जि. ठाणे येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | सॉलीड जेट्टी ३० X १० मी.<br>व जेटी ॲप्रोच ९० X ७.५० मी.)<br>बोटयार्ड (१९० X ३० मी.)<br>मासळी सुकविण्याचा ओटा ( १४० X ३० मी.<br>व ३० X १० मी.)<br>जोडरस्ता ( १५० X ७.५० मी.)<br>बाहय पाणी पुरवठा १ युनिट<br>सौरउर्जा दीप ६० नग | १०२०.०० |
| ३ | चिंबई ता. अंधेरी जि. मुंबई उपनगर येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | जेट्टीची रुंदीकरण व लांबी वाढविणे<br>(रुंदीकरण १५० X ३ ते ५ मी.<br>व लांबी वाढविणे १५० X ५ मी.)<br>बोटयार्ड सह रॅम्प (बोटयार्ड २ नग ८०X३० मी.<br>व ७०X३० मी. रॅम्प ४नग १५X१० मी.)<br>जाळी विणण्याचे शेड २ नग ( २० X ८ मी.)<br>गाईड पोल २ नग<br>सौरउर्जा दीप ६० नग | ८५०.०० |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | बोर्ली मांडला, ता. मुरुड जि. रायगड येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | जेट्टी / वार्फ (वार्फ ७५ X ४० मी.<br>व जेट्टी ६० X ५ मी.)<br>जोडरस्ता (४५० X ७.५० मी.)<br>गाळ काढणे ( ६५०मी.)<br>संरक्षक भिंती (१५०मी)<br>्गाईड पोल ४ नग<br>विधंनविहीर व पाईप लाईन्स, पाण्याची टाकी,<br>पाणी वितरण व्यवस्था १ युनिट<br>सौरउर्जा दीप ६० नग | १२५६.०० |
| ५ | बो□या, ता. गुहागर, जि.रत्नागिरी येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | सॉलीड जेट्टी ( पोचरस्ता ६० X ७.५० मी. व जेट्टी<br>३० X १० मी.)जोडरस्ता (२०० X ७.५० मी.) | ४६०.०० |
| ६ | विजयदुर्ग ता. देवगड जि.सिंधुदुर्ग येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | जेट्टी / वार्फ (१७० X ३० मी.)<br>विधंनविहीर व पाईप लाईन्स, पाण्याची टाकी,<br>पाणी वितरण व्यवस्था १ युनिट<br>सौरउर्जा दीप २० नग | ९५०.०० |
| ७ | मेढा, ता. मालवण, जि.सिंधुदुर्ग येथे मासळी उतरविण्याच्या केंद्रावर मच्छिमारांना मुलभूत सोयी सुविधा पुरविणे. | जेट्टी / वार्फ (१३० X ४५ मी.)<br>विधंनविहीर व पाईप लाईन्स, पाण्याची टाकी,<br>पाणी वितरण व्यवस्था १ युनिट<br>गाईड पोल २ नग<br>सौरउर्जा दीप ६० नग | ८५०.०० |
| | | **एकूण** | **६३१६.००** |